अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ आणि नियम २००८ व सुधारित नियम २०१२, सामूहिक वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व त्याची अंमलबजावणी करण्यासाठी "ग्रामस्तरीय समिती व तालुकास्तरीय कन्व्हर्जन्स समिती स्थापन करणे व जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समिती व राज्यस्तरीय सुकाणु समितीमध्ये बदल करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः वहका -२०२१/प्र.क्र.१८७ /का-१४

आदिवासी विकास विभाग, मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २२ नोव्हेंबर, २०२१

वाचा:

१. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ आणि नियम २००८ व सुधारित नियम २०१२.
२. आदिवासी विकास विभाग शा.नि.क्र.बैठक -२०१३/प्र.क्र.२७२/का-१४, दि. ०५ मार्च, २०१४.
३. आदिवासी विकास विभाग शा.नि.क्र.बैठक -२०१३/प्र.क्र.२७२/का-१४, दि. १२ जुन, २०१५.
४. आदिवासी विकास विभाग शा.नि.क्र.वहका -२०१४/प्र.क्र.६६/का-१४, दि. २४ जुन, २०१५.
५. आदिवासी विकास विभाग शा.नि.क्र.वाहका-२०१६/प्र.क्र.८२/का-१४, दि.०१ ऑक्टोंबर, २०१६.
६. आदिवासी विकास विभाग शा.परिपत्रक.क्र.वाहका-२०१७/प्र.क्र.७७/का-१४, दि.०६ जुलै, २०१७.
७. आदिवासी विकास विभाग शा.नि.क्र.वाहका-२०१८/प्र.क्र.३३/ का.१४, दि. ०५ मे, २०१८.
८. सामुहिक वनहक्क प्राप्त गावातील संवर्धन व व्यवस्थापन आऱाखड्या संदर्भात दि.०५/८/२०२१ रोजी सचिव (आदिवासी विकास) यांच्या अध्यक्षतेखाली झालेली बैठक.

प्रस्तावना -

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ आणि नियम २००८ व सुधारित नियम २०१२ नुसार अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी यांना कलम ३ (१) नुसार वैयक्तिक व सामूहिक वनहक्क किंवा दोहोंचे धारणाधिकार मिळण्याचे अधिकार प्राप्त झालेले आहेत.

अनुसूचित जमातीचे वननिवासी व इतर पारंपारीक वननिवासी यांच्या फायद्यासाठी सामूहिक वनसंपत्तीचे निरंतर व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी ग्रामसभेचे बळकटीकरण करण्याकरिता तसेच वनांवर उपजीविका अवलंबून असलेल्या ग्रामीण समाजाला निरंतर व शाश्वत उपजिविका साधन उपलब्ध करुन देणे, वनांचे व नैसर्गिक साधनसंपत्तीचे संवर्धन, संरक्षण व पुर्ननिर्माणाकरीता परिणामकारक व कार्यक्षम व्यवस्थापन पध्दत अवलंबिणे आवश्यक आहे.

राज्यात माहे ऑगस्ट, २०२१ अखेर ११,८४२ सामूहिक वनहक्कांचे दावे प्राप्त झाले आहेत. त्यापैकी जिल्हास्तरीय समितीने ८,११३ सामूहिक वनहक्क दावे अंतीमत: मान्य केले आहेत. तसेच यापुढेही ग्रामसभांना सामूहिक वनहक्क प्राप्त होऊ शकतात. त्याकरिता विविध शासकिय विभागांतर्गत मंजूर असलेल्या योजनांच्या/ प्रकल्पांच्या मंजूर निधीतून विविध योजना/प्रकल्पांमार्फत उपलब्ध होणा-या निधीचे Convergence करुन MGNREGA/आमदार/खासदार निधी, जिल्हास्तर निधी/ अशासकीय संस्था/CSR लोकसहभाग यांच्या माध्यमातून वनांचे संवर्धन, तेथील नैसर्गिक साधन संपत्तीचे जतन, संरक्षण व संवर्धन याकरिता शाश्वत उपाययोजना करण्यासाठी सामूहिक वनहक्क प्राप्त ग्रामसभांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व त्याची अंमलबजावणी करणे आवश्यक आहे.

सामुहिक वनहक्क प्राप्त गावातील संवर्धन व व्यवस्थापन आऱाखड्या संदर्भात रोजी सचिव (आदिवासी विकास विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली दि.०५/८/२०२१ रोजी झालेल्या बैठकीमध्ये निश्चित केल्यानुसार सामूहिक वनहक्काचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व त्याची अंमलबजावणी करण्यासाठी राज्यातील सर्व विभागांतील सेवा उपलब्ध करुन घेण्याकरीता जिल्हयांमध्ये “ग्रामस्तरीय समिती व तालुकास्तरीय कन्व्हर्जन्स समिती”स्थापन करणे तसेच जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समिती संदर्भातील दि.०१ ऑक्टोबर,२०१६ व राज्यस्तरीय सुकाणू समिती संदर्भातील दि.०५ मार्च,२०१४ शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्यस्तरीय सुकाणू समिती संदर्भातील वाचा येथील अ.क्र.२ येथील दि.०५ मार्च,२०१४ तसेच जिल्हास्तरिय कन्व्हर्जन्स समिती संदर्भातील वाचा येथील अ.क्र.३ येथील दि.१२ जून,२०१५ व अ.क्र.५ येथील दि.०१ ऑक्टोबर,२०१६ चे शासन निर्णय अधिक्रमित करून पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

राज्यातील सर्व ग्रामस्तर, तालुकास्तर व जिल्हास्तरावर खालील प्रमाणे **“ग्रामस्तरीय समिती व तालुकास्तरीय कन्व्हर्जन्स समिती”स्थापन करणे तसेच जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समिती व राज्यस्तरीय सुकाणु समितीच्या रचना व कर्तव्य तसेच जबाबदारी खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.**

**क) “ग्रामस्तरीय समिती, तालुकास्तरिय व जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समिती” स्थापन करण्याचा उद्देश.**

१. सामूहीक वनहक्क व्यवस्थापन समितीचे (वनहक्क कायदा नियम ४(१) ड) गठन करणे.
२. सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समितीच्या सदस्यांची क्षमतावृध्दी करणे.
३. वन्यजीव, जैविक विविधता यांचे संरक्षण करणे.
४. वनांवर उपजिविका अवलंबून असलेल्या ग्रामीण समाजाला निरंतर व शाश्वत उपजिविका साधन उपलब्ध करुन देणे.
५. वनांचे व नैसर्गिक साधनसंपत्तीचे संवर्धन, संरक्षण व पुनर्निमाणाकरीता परिणामकारक व कार्यक्षम व्यवस्थापन करणे.

६. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी यांचे जिवनमान उंचावणे.

७. ग्रामसभेचे बळकटीकरण करणे.

**ख) ग्रामस्तरीय समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.**

| अ.क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १) | ग्रामस्तरीय वनहक्क समितीचे अध्यक्ष | अध्यक्ष |
| २) | ग्रामसेवक | सदस्य |
| ३) | तलाठी | सदस्य |
| ४) | कृषी सेवक | सदस्य |
| ५) | सामूहीक वनहक्क व्यवस्थापन समितीचे सदस्य सर्व | सदस्य |
| ६) | ग्राम रोजगार सेवक | सदस्य |
| ७) | वनपाल वनविभाग | सदस्य सचिव |

**"ग्रामस्तरीय समिती" समितीची कर्तव्य व जबाबदारी.**

१. वनहक्क कायदा २००६ चे नियम ४(१) (ड) ४(१) (च) नुसार ग्रामसभेने गठीत केलेली सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती, सामूहिक वनहक्क प्राप्त क्षेत्रामध्ये संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्यास बांधील असतील. सदर समितीस ग्रामस्तरीय समितीतील अन्य शासकिय सदस्य आराखडे तयार करण्याकरिता सर्वतोपरी मदत करतील.

२. सामूहिक वनहक्क प्राप्त क्षेत्रामध्ये संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्याकरिता, शासनाकडून ग्रामस्तरीय समितीचे गठन करण्यात आले आहे, याबाबत ग्रामसभेस अवगत करणे, सामूहिक वनहक्काबाबतचे महत्व पटवून देणे, सामूहिक वनहक्क प्राप्त क्षेत्रामध्ये संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्याकरिता ग्रामसभेची मंजूरी घेणे, संवर्धन व व्यवस्थापन आराखड्याविषयी ग्रामसभेमध्ये चर्चा घडवून आणणे त्यासाठी बैठका आयोजित करणे, ग्रामसभांमार्फत आराखड्यामध्ये समाविष्ट करावयाची कामे ठरविणे, श्रमदानातून हाती घ्यावयाची कामे, मृदसंधारणेची कामे, जलसंधारणाची कामे प्रस्तावित करणे व त्याविषयीची कार्यपध्दती ठरविणे.

३. ग्रामस्तरीय समितीने सामूहिक वनहक्क प्राप्त क्षेत्रात शिवारफेरी करुन सामूहिक वनहक्क क्षेत्रातील सद्यस्थिती व वनसंसाधनांबाबतची माहिती संकलित करणे, त्यांच्या वेळोवेळी नोंदी ठेवणे व अद्यावत करणे.

४. आराखडे तयार करण्यासाठी तालुका कन्व्हर्जन्स समितीकडून प्राप्त झालेल्या विविध शासकीय योजनांची माहिती व उपलब्ध वन संसाधनांच्या आधारे सामुहिक वनक्षेत्रात करावयाच्या कामांची सुची (क्षेत्र व कालावधी निहाय) तयार करुन त्याचा समावेश संवर्धन व व्यवस्थापन आराखड्यामध्ये करणे.

५. पेसा अंतर्गत घेण्यात येणारी कामे व सामुहिक वनहक्क प्राप्त क्षेत्रामध्ये वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखड्यानुसार करण्यात येणारी कामे यांची सांगड घालण्यात येऊन एकात्मिक पद्धतीने कामे करण्यात यावी, पेसा अंतर्गत गावांच्या ग्रामसभा विकास आराखड्यामध्ये सामूहिक वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखड्याचा समावेश करणे क्रमप्राप्त असेल याची दक्षता घेणे.

६. सामूहीक वनजमिनीचे सर्वेक्षण करणे, जमिनीची पोत, झाडांची निवड, वनक्षेत्रातील कामांची निवड या करिता वनविभागाने आवश्यक ते तांत्रिक सहाय्य करावे .

७. सामाजिक व आर्थिक सर्वेक्षण करणे करिता ग्रामसेवक यांनी सहाय्य करावे.

८. सामूहिक वनहक्काचे फलक लावणे. (गावाचे नांव, सामूहिक वनहक्क प्राप्त क्षेत्राचा आकार/ क्षेत्राचा नकाशा, चतु:सिमा/ हद्द यांचा तपशिल असलेला फलक असावा)

९. सामूहीक वनहक्क प्राप्त क्षेत्र निश्चित करून नकाशा अंतिमरित्या तयार करुन देण्याची जबाबदारी वनविभागाची असेल.

१०. वन संवर्धन व व्यवस्थापन आराखड्याचे प्रारुप तयार करुन विविध शासकिय विभागांच्या सुचना विचारात घेण्यासाठी तालुका कन्व्हर्जन्स समिती समोर सादर करणे.

११. तालुका कन्व्हर्जन्स समितीने आराखड्यामध्ये सुचविलेल्या बदलांनुसार आराखड्याचे प्रारुप अंतिम करुन ग्रामसभेची अंतिम मान्यता घेणे

१२. सदर आराखड्यांच्या अंमलबजावणीच्या मान्यतेसाठी सदर आराखडा तालुका कन्व्हर्जन्स समितीमार्फत जिल्हा कन्व्हर्जन्स समितीस सादर करणे.

१३. आराखड्यांच्या अंतिम मंजूरीनंतर वन, जल, वन्यजीव व जैवविविधतेच्या जतन, संरक्षण व पुर्ननिर्माण करणेकरिता आराखड्यांची अंमलबजावणी करणेची जबाबदारी सामूहीक वनहक्क व्यवस्थापन समितीची राहील. तसेच आराखड्यांनुसार विविध योजनांतर्गत व योजनाबाह्य करावयाची कामांची अंमलबजावणी ग्रामस्तरीय समिती ही तालुकास्तरिय कन्व्हर्जन्स समितीच्या मार्गदर्शनाखाली करणे.

**ग) तालुकास्तरिय कन्व्हर्जन्स समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.**

| अ.क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १) | प्रकल्प अधिकारी | अध्यक्ष |
| २) | तहसिलदार | सह अध्यक्ष |
| ३) | सहाय्यक वनसंरक्षक / वनपरिक्षेत्र अधिकारी वनविभाग | सदस्य |
| ४) | गट विकास अधिकारी, पंचायत समिती | सदस्य |
| ५) | तालुका कृषी अधिकारी | सदस्य |
| ६) | तालुका पशुसंवर्धन अधिकारी | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ७) | सहाय्यक तालुका मत्स्यव्यवसाय अधिकारी | सदस्य |
| ८) | शाखा अभियंता सार्वजनिक बांधकाम | सदस्य |
| ९) | शाखा अभियंता लघुपाटबंधारे | सदस्य |
| १०) | अशासकिय सदस्य (वनहक्क संबंधित तज्ञ व्यक्ती) | सदस्य |
| ११) | सहाय्यक प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास, प्रकल्प कार्यालय | सदस्य सचिव |

**"तालुकास्तरिय कन्व्हर्जन्स समिती" समितीची कर्तव्य व जबाबदारी.**

१. तालुका कन्व्हर्जन्स समितीने बैठक घेऊन समितीमधील सदस्यांचे विभाग निहाय कामकाज निश्चित करणे.

२. ग्रामस्तरीय समितीच्या कामकाजाची रुपरेषा व कालावधी निश्चित करणे.

३. सदर योजनेअंतर्गत सामूहीक वनहक्क व्यवस्थापन समितीचे (वनहक्क कायदा नियम ४(१)(ड) गठन करुन घेणे.

४. सामूहीक वनहक्क प्राप्त गावाचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्याकरिता ग्रामस्तरीय समितीशी समन्वय साधुन आराखडे तयार करुन घेणे.

५. ग्रामस्तरीय समिती व समितीमधील सामूहिक व्यवस्थापन समितीच्या सदस्यांना क्षमतावृध्दीसाठी प्रशिक्षण देणे.

६. संवर्धन व व्यसवस्थापन आराखडे तयार करणेकामी गठीत करण्यात आलेल्या ग्रामस्तरीय समितीच्या कामकाजाचे संनियंत्रण करणे, ग्रामस्तरीय समितीच्या कामकाजाचा दरमहा आढावा घेणे व समितीस येणाऱ्या अडचणींचे निराकरण करणे.

७. ग्रामस्तरीय समितीस सामूहीक वनहक्क क्षेत्र निश्चित करून नकाशा वनविभागाकडून उपलब्ध करुन देणे.

८. आराखडे तयार करण्यासाठी विविध शासकिय योजनांची माहिती व इतर आवश्यक माहिती तसेच विविध शासकिय यंत्रणांच्या सेवा ग्रामस्तरीय समितीस उपलब्ध करुन देणे.

९. पेसा अंतर्गत घेण्यात येणारी कामे व सामुहिक वनहक्क प्राप्त क्षेत्रामध्ये वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखड्यानुसार करण्यात येणारी कामे यांची सांगड घालण्यात येऊन एकात्मिक पद्धतीने कामे करण्यात यावी. पेसा अंतर्गत गावांच्या ग्रामसभा विकास आराखड्यामध्ये सामूहिक वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखड्याचा समावेश करणे क्रमप्राप्त असेल याची दक्षता समितीने घ्यावी.

१०. ग्रामस्तरीय समितीने तयार केलेला प्रारुप आराखड्याच्या अनुषंगाने बैठक घेऊन आराखड्यांमध्ये विविध विभागांच्या सूचना विचारात घेऊन, आवश्यक ते बदल करुन ग्रामसभेच्या अंतिम मान्यतेसाठी ग्रामस्तरीय समितीकडे पाठविणे.

११. ग्रामस्तरीय समितीने ग्रामसभेच्या अंतिम मान्यतेनंतर सादर केलेल्या संवर्धन व व्यवस्थापन आराखड्यांमध्ये नमुद केलेली कामे कोणकोणत्या योजनांमधुन करता येतील याची वर्गवारी करणे तसेच त्यानुसार संबंधित शासकीय विभागांकडून त्यासाठी विभाग निहाय आवश्यक खर्चाचे अंदाजपत्रक तयार करुन घेणे व खर्चाचे नियोजन करणे.

१२. योजनाबाह्य कामकाजांची वर्गवारी करणे व सदर कामांच्या निधी उपलब्धतेसाठी जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीचे मार्गदर्शन घेणे. व त्यानुसार विकास कामे प्रस्तावित करणे.

१३. ग्रामसभेच्या अंतिम मान्यतेनंतर सदर आराखड्यांच्या अंमलबाजवणीसाठी योजना निहाय येणाऱ्या खर्चाचा आराखडा जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समिती समोर सादर करणे व आराखड्यांच्या अंमलबजावणीकरिता जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीचे मंजूरी घेणे.

१४. जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीच्या आदेशानुसार आराखड्यांच्या अंमलबजावणीचे कामकाज करणे.

**घ) जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीची रचना खालील प्रमाणे राहील.**

| अ.क्र. | समिती सदस्य | | पद |
|---|---|---|---|
| १) | जिल्हाधिकारी | :- | अध्यक्ष |
| २) | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद | :- | सह अध्यक्ष |
| ३) | उप वनसंरक्षक | :- | उपाध्यक्ष |
| ४) | उप जिल्हाधिकारी (मनरेगा) | :- | सदस्य |
| ५) | जिल्हा नियोजन अधिकारी | :- | सदस्य |
| ६) | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | :- | सदस्य |
| ७) | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी | :- | सदस्य |
| ८) | कार्यकारी अभियंता लघुपाटबंधारे | :- | सदस्य |
| ९) | कार्यकारी अभियंता सार्वजनीक बांधकाम | :- | सदस्य |
| १०) | सहाय्यक संचालक, मत्स्यव्यवसाय संचालनालय | :- | सदस्य |
| ११) | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | :- | सदस्य सचिव |

**"जिल्हास्तरिय कन्व्हर्जन्स समिती" समितीची कर्तव्य व जबाबदारी**

१. अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ आणि नियम २००८ व सुधारित नियम २०१२ प्रमाणे वैयक्तिक तसेच सामूहिक वनहक्क प्राप्त

झालेल्यांना दावा मान्यतेनुसार सर्व शासकीय विभागांकडुन विविध योजनांचा लाभ मिळणेकरिता सहाय्यता मिळेल याची खात्री करणे.

२. वनहक्क नियम २००८ च्या नियम ४ अंतर्गत ग्रामसभांना त्यांची कामे पार पाडण्यासाठी प्रशिक्षण निधीचा विनीयोग इत्यादीबाबत सर्वतोपरी मदत मिळेल याची खात्री करणे, विशेषत:

अ) वनहक्कांची मान्यता अधिनियम, २००६ च्या कलम ५ मधील तरतुदीनुसार वन्यजीव, वने आणि जैव विविधतेचे संरक्षण करण्याठी ग्रामसभेच्या सदस्यांची सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती (CFRMC) स्थापन करण्यासाठी तसेच बँक खाते उघडण्यासाठी ग्रामसभांना मदत करणे.

ब) वनहक्क सुधारणा नियम २०१२ च्या नियम ४ (१) (च) नुसार संवर्धन आणि व्यवस्थापन आराखडा तयार करण्यासाठी ग्रामसभा आणि सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती (CFRMC) यांना मदत करणे तसेच वनविभागाच्या सूक्ष्म योजना किंवा चालू योजना किंवा व्यवस्थापन योजनाबरोबर सदर व्यवस्थापन आराखडा ग्रामसभा आणि त्यांच्या समित्यांना करणे आवश्यक वाटेल अशा फेरबदलांनिशी एकत्रीकरण करण्यासाठी ग्रामसभा आणि त्यांच्या समित्यांना सर्वतोपरी मदत पुरविणे.

३. ग्रामसभा व सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती (CFRMC)) यांनी तयार केलेला संवर्धन व्यवस्थापन आराखड्यानुसार सामूहिक वनहक्कांची अंमलबजावणी करण्यासाठी व घ्यावयाच्या कामांसाठी वनविभाग, कृषि, पशुसंवर्धन व मत्स्यव्यवसाय विभाग, ग्राम विकास व जलसंधारण विभाग (मनरेगा घटक) इ. विभागांच्या सहकार्याने सामूहिक वनहक्कांचे व्यवस्थापन करणे करिता क्षेत्रिय स्तरावरील विविध शासकिय यंत्रणांच्या सेवा ग्रामसभा यांना उपलब्ध करुन देणे.

४. आराखड्यांनुसार मागणी केलेल्या कामांची अंमलबजावणी करणेकरिता विविध शासकीय विभागांच्या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करून घेणे. ज्या कामांची अंमलबजावणी नियमित शासकीय योजनेअंतर्गत होऊ शकणार नाही अशा कामांच्या अंमलबजावणी करिता, आदिवासी उपयोजना घटक, जिल्हा नियोजन समिती, आमदार/खासदार निधी, अशासकीय संस्था/CSR लोकसहभाग याद्वारे निधी उपलब्ध करून घेण्याचे नियोजन करून तालुकास्तरीय कन्व्हर्जन्स समिती मार्फत आराखड्यांच्या अंमलबजावणी करून घेणेकरिता सर्वोतोपरी प्रयत्न करेल.

५. आराखड्यांमध्ये नमूद योजनेतंर्गत व योजनाबाह्य कामांची अंमलबजावणी करण्यासाठी मान्यता देणे.

६. जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समिती, सर्व गावांना सामूहिक वनहक्क दावे दाखल करण्यासाठी आणि सामूहिक वनहक्क व्यवस्थापन समिती स्थापन करण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न करेल.

७. कोणताही निर्णय घेण्यापुर्वी अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ चे कलम ३ आणि कलम ५ अंतर्गत देण्यात आलेले अधिकार मोडले जाणार नाहीत याबाबत जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीने दक्षता घेणे आवश्यक असेल.

८. पेसा अंतर्गत गावांना, त्यांच्या सामूहिक वनहक्क आराखड्याची अंमलबजावणी विविध यंत्रणांकडुन करून घेण्यासाठी आदिवासी विकास विभागाच्या ५ टक्के निधीतुन, आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. पेसा-२०१५/प्र.क्र.१९/का.१७, दि.२१/०४/२०१५ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार खर्च करण्याची मुभा राहिल. जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समिती त्याबाबत वेळोवेळी आढावा घेईल.

९. पेसा अंतर्गत घेण्यात येणारी कामे व सामुहिक वनहक्क प्राप्त क्षेत्रामध्ये वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखड्यानुसार करण्यात येणारी कामे यांची सांगड घालण्यात येऊन एकात्मिक पद्धतीने कामे करण्यात यावी पेसा अंतर्गत गावांच्या ग्रामसभा विकास आराखड्यामध्ये सामूहिक वनहक्कांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखड्याचा समावेश करणे क्रमप्राप्त असेल याची दक्षता समितीने घ्यावी.

१०. जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीची बैठक दरमहा घेण्यात यावी.

११. संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व त्याची अंमलबजावणी करणेकरिता गठीत करण्यात आलेल्या तालुका कन्व्हर्जन्स समितीचे संनियंत्रण करणे, समितीचा आढावा घेणे व समितीस येणाऱ्या अडचणींचे निराकरण करणे.

१२. जिल्हा स्तरीय कन्व्हर्जन्स समितीवर संनियंत्रण राज्य स्तरीय सुकाणू समितीचे राहील.

**च) प्रशिक्षण**

संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्यासाठी आवश्यक ते प्रशिक्षण व मार्गदर्शन आयोजीत करण्याचे कामकाज आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे यांचेमार्फत केले जाईल. प्रशिक्षणासाठी आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे यांना उपलब्ध होणा-या निधीमधून सदर प्रशिक्षणाचा खर्च भागवावा व आवश्यकता भासल्यास यासाठी आदिवासी विकास विभागाकडे निधी मागणी करावी.

**छ) निधी**

संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्यासाठी **प्रति सामूहिक वनहक्क दाव्याकरिता** (सामूहिक वनहक्क प्राप्त ग्रामसभा) निधी आदिवासी विकास विभागामार्फत एकात्मिक आदिवासी

विकास प्रकल्प कार्यालयाच्या स्तरावर उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याचा तपशिल खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | बाब | दर (रु.) |
|---|---|---|
| १ | सामुहिक वनहक्क व्यवस्थापन समिती सदस्यांचे प्रशिक्षण व क्षमता वृध्दी व जन जागृती | ३,००० |
| २ | जिल्हा स्तरीय कन्व्हर्जन्स समितीच्या कामकाजाकरिता. | १,००० |
| २ | तालुका स्तरीय कन्व्हर्जन्स समितीच्या कामकाजाकरिता. | २,००० |
| ३ | ग्रामस्तरीय समिती व्यवस्थापन आराखडे छपाई, स्टेशनरी व सामुहिक वनक्षेत्राचे फलक लावणे. | ६,००० |
| | **एकुण** | **१२,०००** |

**ज) प्रकल्पाचा कालावधी**

तालुक्यातील सर्व सामूहिक वनहक्क प्राप्त ग्रामसभांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे सहा महिन्यांचा असेल त्याचा तपशिल खालील प्रमाणे असेल. पुर्ण करण्याची जबाबदारी तालुका कन्व्हर्जन्स समितीची राहिल.

| अ.क्र. | कामकाज | कामकाजाचा कालावधी |
|---|---|---|
| १) | ग्रामस्तरीय समितीने प्रारुप आराखडा तयार करुन तालुका कन्व्हर्जन्स समिती समोर सादर करणे. | ३ महिने |
| २) | तालुका स्तरीय समितीकडे प्राप्त झालेल्या प्रारूप आराखड्याच्या अनुषंगाने बैठक घेऊन ग्रामस्तरीय समितीने तयार केलेला प्रारुप आराखड्यांमध्ये आवश्यक ते बदल करुन आराखडे ग्रामसभेच्या अंतिम मान्यतेसाठी ग्रामस्तरीय समितीकडे पाठविणे. | १ महिना |
| ३) | तालुका स्तरीय समिती, ग्रामसभेने आराखड्यांना दिलेल्या अंतिम मान्यतेनंतर आराखडे अंमलबजावणीच्या मान्यतेसाठी (सदर आराखड्यांमध्ये समाविष्ट असलेल्या कामांच्या योजनेनिहाय येणारा खर्च व योजनाबाह्य असलेल्या कामांच्या संभाव्य खर्चासह तपशिल) जिल्हा कन्व्हर्जन्स समिती समोर सादर करेल. | २ महिने |
| ४) | जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीच्या सुचनेनुसार आराखड्यांच्या अंमलबजावणीचे कामकाज करणे. | पुढील कालावधी |

**झ) संवर्धन व व्यवस्थापन आराखड्याचे स्वरुप**

१. संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्यासाठी आदिवासी विकास विभाग शासन परिपत्रक दि. ६ जुलै, २०१७ अन्वये मार्गदर्शक सुचना विहीत करण्यात आलेल्या आहे. त्यानुसार संवर्धन व व्यवस्थापन आराखड्याचे स्वरुप असणे अपेक्षित आहे.

२. ग्रामसभा तिच्या सदस्यांना व्यवस्थित समजेल अशा सोप्या स्वरुपात संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करावे.

३. वनहक्क अधिनियम २००६ च्या कलम ३(१)(झ) आणि कलम ५ नुसार सामूहिक वनहक्कांचे संरक्षण पुनर्निर्माण किंवा संवर्धन किंवा व्यवस्थापन या बाबतचे प्राधिकार ग्रामसभा व ४(१) (ड) अंतर्गत गठीत समितीस असल्याने सवंर्धन व व्यवथापन आराखड्यांमध्ये वनांचे संरक्षण संवर्धन, पुनर्निर्माण तसेच वन्यजीव आणि जैवविविधता यांचे संरक्षण इत्यादी बाबींचा प्रामुख्याने समावेश असावा.

४. सामूहिक वनहक्क व्यवस्थापन आराखड्यामध्ये जंगलात प्रवेश, जंगलाचा वापर आणि जंगलाचे संवर्धन याबाबतचे नियम आणि नियमनाचा समावेश असावा.

**त) राज्यस्तरीय सुकाणू समिती रचना**

| अ.क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग , मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव, मृद व जलसंधारण,विभाग,मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव, पदुम, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव, (रोहयो), मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ८ | आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक | सदस्य |
| ९ | आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे. | सदस्य ,सचिव |

**(टीपः- आवश्यकतेनुसार इतर विभागांच्या अधिका-यांना सदर बैठकिस आमंत्रित करण्यात यावे.)**

**"राज्य स्तरीय सुकाणू समिती" समितीची कर्तव्य व जबाबदारी**

१. सामुहिक वनहक्क प्राप्त गावांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व त्यांची अमलबजावणी संदर्भात प्रभावी नियंत्रण व संनियंत्रण ठेवणे.

२. जिल्हास्तरीय कन्व्हर्जन्स समितीला मार्गदर्शन करणे तसेच सदर प्रकल्पाचे मुल्यमापन करणे.

३. सामुहिक वनहक्क प्राप्त गावांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व त्यांची अमलबजावणीसंदर्भात आदिवासी विकास विभाग,महाराष्ट्र राज्य यांचा सहभाग मार्गदर्शक व समन्वयक असा असेल.

४. आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक/ आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे (या दोहोंपेकी जे नोडल अधिकारी असतील ते ) हे दर तीन महिन्याने या महिमेचा आढावा घेतील व संबधित विभागाचे प्राधिकृत अधिकारी यास उपस्थित असतील.

५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचा अध्यक्षतेखाली ६ महिन्यातून एकदा सुकाणू समिती बैठक आयोजित करण्यात येईल. कन्व्हर्जन्स योजने करिता लागणारा निधी आवश्यकतेनुसार आदिवासी उपघटक योजनेतून भागविण्यात यावा.

६. संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करणे व अंमलबजावणी करणे कामी गठीत करण्यात आलेल्या जिल्हा कन्व्हर्जन्स समितीवर राज्यस्तरीय सुकाणू समितीचे संनियंत्रण राहील.

**थ)** वरील नमूद योजनेकरिता आदिवासी विकास विभाग, महाराष्ट्र राज्य, यांचा सहभाग मार्गदर्शक व समन्वयक असा असेल.

**द)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२१११२२१३२०१३४५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Vithalrao Kove

Digitally signed by Satish Vithalrao Kove
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, serialNumber=ce18732734ba0742d7712775e8f0ad400558e8748375399762fd447c3e9ac1eb, cn=Satish Vithalrao Kove
Date: 2021.11.22 13:37:40 +05'30'

**( सतीश वि. कोवे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मुंबई.
२. मा.सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
७. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई.
८. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव ,मंत्रालय,मुंबई.
९. मा. सर्व मंत्री, यांचे खाजगी सचिव.मंत्रालय,मुंबई.
१०. मा. सर्व राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.

११. मा. विधानसभा / विधान परिषद, सदस्य सर्व
१२. मुख्य सचिव,यांचे उप सचिव,मंत्रालय,मुंबई
१३. अ.मु.स./प्र.स./सचिव,विभाग सर्व ,मंत्रालय मुंबई.
१४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१६. सर्व जिल्हाधिकारी,
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक
१८. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक.
१९. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर.
२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,
२१. सर्व जिल्हा कृषी अधिकारी,
२२. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
२३. सर्व कार्यकारी अभियंता,जलसंपदा विभाग
२४. सर्व कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग
२५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
२६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
२७. सर्व नियंत्रक अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८. निवडनस्ती कार्यासन १४.